**विशेष महानगर दंडाधिकारी व विशेष न्यायदंडाधिकारी यांच्या पदावरील सेवानिवृत्त न्यायिक अधिकारी यांना मानधन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

विधी व न्याय विभाग

शासन निर्णय क्रमांक : विन्यादं २००९/(प्र.क्र.१२२/०९)-का.११.

विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक :२६ फेब्रुवारी, २०१०.

पहा:- १) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.विमादं/२००९/(प्र.क्र.१२२)-का.११, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दि.१७ नोंव्हेबर, २००९.

२) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.विमादं/२००९/(प्र.क्र.१२२)-का.११, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दि.२१ जानेवारी, २०१०.

**शासन निर्णय :- उपरोक्त संदर्भातील क्र१ व २ येथील शासन निर्णय याद्वारे अधिक्रमीत करण्यात येऊन खालील प्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.**

फौजदारी प्रक्रिया संहिता, १९७३ च्या कलम १८ अन्वये बृहन्मुंबईकरिता विशेष महानगर दंडाधिकारी व कलम १३ अन्वये मुफसिलकरिता विशेष न्यायदंडाधिकारी यांची मा.उच्च न्यायालयामार्फत नियुक्ती केली जाते. या पदावर सेवा निवृत्त न्यायिक अधिकारी नेमल्यास या कामात पारदर्शकता येईल व गुणवत्ता पूर्वक कार्य होईल या उद्देशाने सेवा निवृत्त न्यायिक अधिकारी यांनी काम करण्यास ईच्छूकता दाखविल्यास त्यांची उपरोक्त पदांवर प्रथम प्रायोगिक तत्वावर नियुक्ती करण्यात यावी. व सदर दंडाधिकारी पदावर काम करणा-या सेवा निवृत्त न्यायिक अधिका-यांना खालीलप्रमाणे मानधन देण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला आहे.

(१) मुंबई शहरासाठी रु.५००/- (रु.१००/- प्रवासभत्ता धरुन) प्रतिदिनएकत्रित..

(२) अन्य शहरांसाठी रु.३००/- (रु.१००/- प्रवासभत्ता धरुन) प्रतिदिनएकत्रित.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च, मुंबई शहरासाठी "मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान, (००)१०७ इलाखा शहर दंडाधिकारी यांची न्यायालये- (००) (०१) इलाखा शहर दंडाधिकारी यांची न्यायालये (२०१४०२३४) (०१) वेतन या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व अन्य शहरांसाठी "मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान, १०५- दिवाणी व सत्र न्यायालये (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश (२०१४ ०१७ २) (०१) वेतन या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या शिर्षाखालील मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६९९/०९/व्यय-६, दि.३०.१०.२००९ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(कां. च. धोखे)

शासनाच्या अवर सचिव

मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा व सत्र न्यायाधिश,
सर्व जिल्हा दंडाधिकारी,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, व्यय-६, मंत्रालय, मुंबई ३२,
विधी व न्याय विभाग, १२,२३,२४,२५,मंत्रालय, मुंबई ३२
निवडनस्ती.